**प्रकल्पग्रस्त अथवा त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्ती व स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित व्यक्ती यांना शासकीय व निमशासकीय सेवेत नियुक्ती देतांना शासन आदेशांचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांक : प्रकल्प-१००२/प्र.क्र.५/२००२/१६-अ,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ३/९/२००२

संदर्भ :- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एईएम-१०८०/३५/१६-अ, दि.२१.१.८०.
२)शासन परिपत्रक क्र.सीएनएस-१०८७/४९९/के.नं.१२/१६-अ, दि. ४.३.१९९१
३) शासन परिपत्रक,महसूल व वन विभाग,क्र. आरपीए-१०९३/प्र.क्र.१३९/र-१,दि.२२.९.९३
४) शासन निर्णय,सा.प्र.वि.,क्र:एसआरव्ही-१०९४/१००४/प्र.क्र.३०/१६-अ, दि.१७.११.९४
५) शासन परिपत्रक,सा.प्र.विभाग,क्रमांक:प्रानिमं-१२९६/प्र.क्र.१४९/९६/१३-अ, दि.३.१.९७
६) शासन परिपत्रक क्रमांक:प्रकल्प-१०००/प्र.क्र.२७/२०००/१६-अ, दि.१३ सप्टेंबर, २०००.
७) शासन परिपत्रक क्रमांक:प्रकल्प-१००१/१०९/प्र.क्र.१३/२००१/१६-अ, दि.७ एप्रिल, २००१.

**शासन परिपत्रक**

संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये, प्रकल्पग्रस्त व्यक्ती व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती यांना शासन सेवा व शासन पुरस्कृत महामंडळे, शासनाकडून सहाय्य मिळणारी महामंडळे, शासनाने चालविलेल्या संस्था, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपालिका आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे अशी इतर सर्व प्राधिकरणे, सेवा व संस्था यांच्या आस्थापनेवरील गट क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे वगळून) आणि गट ड मधील पदांवरील नेमणूकीमध्ये एकूण जागांच्या ५% पर्यन्त सर्वोच्च प्राथम्यक्रम देण्यात आला आहे. संदर्भाधिन क्र.४ च्या शासन निर्णयानुसार प्रकल्पग्रस्तांसाठी देण्यात आलेल्या ५% सर्वोच्च प्राथम्यात भूकंपग्रस्तांचाही समावेश करण्यात आला आहे. संदर्भाधिन क्र.५ च्या शासन परिपत्रकानुसार प्रकल्पग्रस्तांना नियुक्तीसंबंधात नियुक्ती प्राधिका-यांनी त्यांच्याकडे आलेल्या प्रकल्पग्रस्तांच्या परस्पर अर्जातून नियुक्त्या करण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या. संदर्भाधिन क्र.६ च्या परिपत्रकान्वये नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी प्रकल्पग्रस्त उमेदवाराच्या परस्पर नियुक्त्या करु नयेत व प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्त्या करताना सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे रिक्त असलेल्या पदांपैकी प्रकल्पग्रस्तांमधून भरावयाच्या पदांसाठी मागासवर्गीयांच्या आरक्षणात बाधा येणार नाही, याची दखल घेवून संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे प्रकल्पग्रस्तांच्या प्रतिक्षा यादीतील उमेदवाराची मागणी करावी व जिल्हाधिकारी कार्यालयाने प्रकल्पग्रस्त उमेदवारांच्या यादीतून आवश्यक उमेदवारांची जेष्ठतेनुसार शिफारस संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांना करावी, अशा सूचना देण्यात आल्या आहेत. संदर्भाधिन क्र.२ च्या परिपत्रकान्वये शासकीय व निमशासकीय सेवेतील गट-क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे वगळून) व गट-ड मधील पदांवर नियुक्ती करतांना स्वांतंत्र्य सैनिकांच्या नामनिर्देशितांना प्रथम पसंतीक्रम देण्यात आला आहे.

२. वरील परिच्छेदामध्ये उल्लेख केल्या प्रमाणे प्रकल्पग्रस्त व स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित यांच्या नियुक्त्यांबाबत शासनाने पध्दती विहित केल्या आहेत. तथापि, नियुक्त्या करतांना काही प्रकरणी या विहित पध्दतींचे पालन केले जात नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे या परिपत्रकाद्वारे सर्व विभागांना/विभाग प्रमुखांना व नियुक्ती प्राधिकाऱ्यांना प्रकल्पग्रस्त व स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित यांच्या

(कृ.मा.प.

नियुक्त्या करतांना संदर्भाधिन आदेशांचे काटेकोरपणे पालन करावे, अशा सूचना देण्यात येत आहेत. या सूचनांचे उल्लंघन झाल्यास त्याची गंभीर दखल घेण्यात येईल याची त्यांनी नोंद घ्यावी.

हे आदेश वित्त विभागाने पदनिर्मिती पदभरती इ.बाबत दि.१०.९.२००१ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( द. दा. देशपांडे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
४) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव.
* ७) प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई.
* ८) प्रबंधक,उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई.
* ९) प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई.
* १०) प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त,मुंबई.
* ११) सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.
* १२) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
* १३) सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) संचालक ,समाजकल्याण पुणे.
१७) आयुक्त,आदिवासी विकास ,नाशिक.
१८) संचालक,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे.
१९) संचालक,सेवायोजन,मुंबई
२०) सहायक आयुक्त,(मागासवर्ग कक्ष),सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये.
२१) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख.
२३) सर्व मंत्रालयीन विभाग
२४) निवड नस्ती.

* **(पत्राने)**

---

एच-769(बी)(4500-9-02)1अ.
C:\DESHPANDE\Project affected/38